**मा.कामगार न्यायालय, रत्नागिरी येथे तक्रारदार कामगारांनी दाखल केलेल्या रिकव्हरी ॲप्लीकेशन यु.एल.पी. क्र.९ ते २३/२०१३ मध्ये मा.न्यायालयाने दि.१५/०३/२०१४ रोजी दिलेल्या निकालानुसार एम.आर.टी.यु. व पी.यु.एल.पी कायदा १९७१ मधील कलम ५० अन्वये दिलेल्या रिकव्हरी सर्टीफीकेटच्या अनुषंगाने रक्कम रु.७,२५,४९९/- अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांकः- दुविआ १४१४/प्र.क्र.१४७/पदुम-९

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांकः-१३/११/२०१४

**वाचा:-** १) शासन निर्णय क्रमांक-दुविआ २७०९/प्र.क्र.२९०/पदुम-९, दि.०७/०२/२०११.

२) उप आयुक्त (प्रशासन), दुग्धव्यवसाय विकास विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आदुवि-११/प्रादुविअ/नवी मुंबई/युएलपी क्र.१६ ते ३५/०६/२४४२, दि.३०/०५/२०१४.

**प्रस्तावना:-**

मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेली एस.एल.पी. क्रमांक-१४७९३-१४८३५/०९ मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.०९/१०/२००९ च्या आदेशान्वये फेटाळल्यामुळे मा.औद्योगिक न्यायालय, कोल्हापूर यांनी युएलपी क्रमांक-२१६ ते २३७/२००० आणि ३२८/२००१ मध्ये दि.१०/०४/२००७ रोजी दिलेल्या निर्णयानुसार शासकीय दूध योजना रत्नागिरी येथील रोजंदार कामगारांना २४० दिवस सेवा पूर्ण झाल्यापासून देय असलेल्या फरकाची रु.१७,०२,३६९/- इतकी रक्कम मा.न्यायालयात भरणा करण्यास संदर्भाधीन क्रमांक-१ येथील दि.०७/०२/२०११ च्या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात आलेली आहे.

२. तथापि, रोजंदारीवरील २४० दिवस सेवा पूर्ण झाल्यापासून नियमित आस्थापनेवरील वेतन भत्ते फरकाची रक्कम अनुज्ञेय करण्याच्या दृष्टीने प्रस्तुत प्रकरणातील कामगारांनी मा.कामगार न्यायालय,रत्नागिरी येथे रिकव्हरी ॲप्लीकेशन युएलपी क्रमांक-९ ते २३/२०१३ दाखल केलेल्या होत्या. सदर रिकव्हरी ॲप्लीकेशनमध्ये मा.कामगार न्यायालय, रत्नागिरी यांनी एम.आर.टी.यु. व पी.यु.एल.पी. कायदा १९७१ मधील कलम-५० अन्वये १५ तक्रारदार कामगारांना वेतन भत्ते फरकाची रक्कम अदा करण्याच्या दृष्टीने रु.७,२५,४९९/- इतक्या रकमेची वसुली प्रमाणपत्रे दिलेली आहेत. सदर वसुली प्रमाणपत्रांना अनुसरुन संबंधित तक्रारदार कामगारांना वेतन भत्ते फरकाच्या रकमेपोटी रु.७,२५,४९९/- इतकी रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.कामगार न्यायालय, रत्नागिरी यांनी रिकव्हरी ॲप्लीकेशन यु.एल.पी. क्रमांक ९ ते २३/२०१३ मध्ये दि.१५/३/२०१४ रोजी दिलेल्या वसुली प्रमाणपत्रानुसार सदर तक्रारीतील तक्रारदार कामगारांना रोजंदारीवर २४० दिवस सेवा पूर्ण झाल्यापासून नियमित आस्थापनेवरील वेतन भत्ते फरकाची रु.७,२५,४९९/- (अक्षरी रुपये सात लक्ष पंचवीस हजार चारशे नव्याण्णव फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची रक्कम आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, वरळी, मुंबई व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, मुंबई विभाग, मुंबई यांच्या कार्यालयाने परिगणित केलेली असल्याने या परिगणित केलेल्या रकमेपेक्षा अधिक रक्कम देय होत असल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्यास अधिकच्या रकमेस शासन स्तरावरुन मंजूरी मिळणार नाही. याबाबत संबंधित परिगणना करणारे अधिकारी / कर्मचारी जबाबदार राहतील.

३. यासाठी होणारा खर्च “लेखाशिर्ष-मागणी क्र.डी-०५, २४०४, दुग्धव्यवसाय विकास, (००) १०१, संचलन व प्रशासन, (०१)(०१) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, संकेतांक क्र.२४०४००१८(भारीत), बाब क्र.५०, इतर खर्च” याखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, वरळी, मुंबई कार्यालयाने त्यांना उपरोक्त लेखाशिर्षामधील उपलब्ध असलेल्या अनुदानापैकी मंजूर रकमेच्या मर्यादत संगणक प्रणालीमार्फत दुग्धशाळा व्यवस्थापक, शासकीय दूध योजना, रत्नागिरी या कार्यालयास अनुदान उपलब्ध करुन द्यावे.

५. सदर कामासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून दुग्धशाळा व्यवस्थापक, शासकीय दूध योजना, रत्नागिरी यांना घोषित करण्यात येत आहे.

६. उपरोक्त लेखाशिर्षामधील उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेत संबंधित कार्यालयाने खर्च करावा.

७. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-अनौसं-४३३/१४/व्यय-२, दि.२५/०९/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११३१११४२४६९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.11.13 16:19:37 +05'30'

( श.मा.साठे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.

२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, वरळी, मुंबई.

३) उप आयुक्त (प्रशासन), दुग्धव्यवसाय विकास, मुंबई.

४) उप आयुक्त (वित्तीय सल्लागार), आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, वरळी, यांचे कार्यालय,मुंबई.

५) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, मुंबई विभाग, मुंबई.

६) दुग्धशाळा व्यवस्थापक, शासकीय दूध योजना, रत्नागिरी.

७) अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.

९) वित्त विभाग, व्यय-२ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) कक्ष अधिकारी, पदुम-१६ कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) निवडनस्ती.